सन २०२४-२०२५ या आर्थिक वर्षातील प्रधानमंत्री जन आरोग्य योजना या केंद्र पुरस्कृत योजनेसाठी २२१० जी ४४९ (General) या लेखाशिर्षाखाली २०- इतर प्रशासकीय खर्चाकरिता राज्य हिस्स्यापोटी (४०%) रु.५.४१ कोटी इतका निधी वितरीत करणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक आरोग्य विभाग

**शासन निर्णय क्रमांकः पूरक -२०२५/प्र.क्र.३६/ई-९३२८४९/आरोग्य-६**

गो.ते. रुग्णालय संकुल इमारत, १० मजला,
मंत्रालय, एल.टी. मार्ग, मुंबई
दिनांक: २९ मार्च, २०२५.

वाचा -

१) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्र.रास्वयो-२०१८/प्र.क्र.७४/आरोग्य-६, दिनांक २१ सप्टेंबर, २०१८.
२) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्र.मफुयो-२०२३/प्र.क्र.१६०/आरोग्य-६, दिनांक २८ जुलै, २०२३
३) शासन निर्णय क्र. मफुयो-२०२४/प्र.क्र.८२/आरोग्य-६, दिनांक ०३ जून, २०२४
४) शासन निर्णय क्र. मफुयो-२०२४/प्र.क्र.८२/आरोग्य-६, दिनांक ५ जुलै, २०२४
५) शासन निर्णय क्र. मफुयो-२०२४/प्र.क्र.८२/आरोग्य-६, दिनांक २७ फेब्रुवारी, २०२५
६) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक : अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३, दि. ०१.०४.२०२४ व क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि. २५.०७. २०२४
७) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक : अर्थसं-२०२४/प्र.क्र.१०८/अर्थ-३, दि. ०८.०१.२०२५
८) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक : अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि. १७.३.२०२५
९) राज्य आरोग्य हमी सोसायटी, मुंबई यांचे पत्र क्रमांक: राआहसो/लेखा/प्रअ/१११७२/४९१/२०२४-२५, दिनांक २१.०३.२०२५

प्रस्तावना :-

आयुष्यमान भारत-प्रधानमंत्री जन आरोग्य योजना राज्यामध्ये राबविण्याचा निर्णय दिनांक २१.०९.२०१८ च्या शासन निर्णयान्वये घेण्यात आलेला आहे. तसेच संदर्भ क्रमांक ०२ च्या शासन निर्णयान्वये विस्तारीत महात्मा ज्योतिराव फुले जन आरोग्य योजना व प्रधानमंत्री जन आरोग्य योजना राबविण्याचा निर्णय घेण्यात आलेला आहे. त्यानुषंगाने प्रधानमंत्री जन आरोग्य योजना ही केंद्र पुरस्कृत

योजना केंद्र व राज्य शासनाच्या सहभागातून राज्यात राबविण्यात येत असून यामध्ये केंद्र शासनाचा ६०% व राज्य शासनाचा ४०% आर्थिक सहभाग आहे. सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात सदर योजनेसाठी २२१० जी ४४९ (सर्वसाधारण) २०-इतर प्रशासकीय खर्च करीता रु.३.०० कोटी व  जुलै, २०२४ च्या पावसाळी अधिवेशनात पुरवणी मागणीद्वारे रु. ५.८० कोटी, असा एकूण रु. ८.८० कोटी निधी अर्थसंकल्पीत करण्यात आलेला होता. सदर मंजूर निधीमधून राज्य आरोग्य हमी सोसायटीस प्रशासकीय बाबींवरील खर्चासाठी यापूर्वी संदर्भ क्र. ३, संदर्भ क्र. ४ व संदर्भ क्र. ५ च्या शासन निर्णयानुसार एकूण रु.८.८० कोटी इतका निधी वितरीत करण्यात आलेला आहे. मार्च, २०२५ च्या अर्थसंकल्पीय अधिवेशनात २०-इतर प्रशासकीय खर्च या उद्दिष्टाखाली रु. ५,४१,८५,०००/- इतका निधी पुरवणी मागणी प्रस्तावास मान्यता दिली आहे.सुधारित अंदाजत सदर तरतूद सन २०२४-२५ साठी उपलब्ध असून सदर निधी राज्य आरोग्य हमी सोसायटीस आवश्यक प्रशासकीय बाबींवरील खर्चासाठी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

प्रधानमंत्री जन आरोग्य योजनेसाठी राज्य शासनाच्या हिश्श्यापैकी (४०%)  प्रशासकीय खर्चाकरीता रु.५,४१,८५,०००/- (अक्षरी रुपये पाच कोटी एकेचाळीस लक्ष पंचाऐंशी हजार फक्त) इतका सशर्त निधी राज्य आरोग्य हमी सोसायटीच्या खात्यावर तात्काळ वर्ग करण्यासाठी नियंत्रक अधिकाऱ्याकडे सुपुर्द करण्यात येत  आहे. सदर रकमेचा धनादेश राज्य आरोग्य हमी सोसायटीच्या नावे काढण्यात यावा.

२.    सदर निधी आयुष्यमान भारत-प्रधानमंत्री जन आरोग्य योजना ॲडमीन या खात्यामध्ये जमा करण्यासाठी रु.५,४१,८५,०००/- (अक्षरी रुपये पाच कोटी एकेचाळीस लक्ष पंचाऐंशी हजार फक्त) राज्य आरोग्य हमी सोसायटीकडे वर्ग करण्यास मंजूरी देण्यात येत आहे. सदर अनुदानाचे देयक अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांच्याकडे सादर करण्यासाठी प्रशासकीय अधिकारी, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई हे आहरण व संवितरण अधिकारी तसेच सहसंचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई हे नियंत्रक अधिकारी असतील.

३.    वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३, दिनांक ०१ एप्रिल, २०२४ सोबत जोडलेल्या परिशिष्टातील अनु. क्र. ८ मधील मूद्दा क्र. १ ते १० मधील अटी व शर्तीची पूर्तता केली असल्याचे राज्य आरोग्य हमी सोसायटीने शासनास कळविले असून यापूर्वी शासनाकडून वितरीत केलेल्या निधीचा विनियोग, ज्या कारणासाठी निधी मंजूर केला होता त्याच प्रयोजनासाठी केल्याबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र सादर करण्यात आले आहे. तसेच या शासन निर्णयान्वये वितरीत केलेला निधी  राज्य आरोग्य हमी सोसायटीच्या स्वतंत्र बँक खात्यामध्ये (ESCROW Account) जमा करुन खर्च करण्यात येत असल्याचे त्याचप्रमाणे वित्त विभागाच्या दिनांक १.०४.२०२४ च्या शासन निर्णयातील संबंधित असलेल्या सर्व तरतुदींचे/ अटी व शर्तींचे पालन करण्यात यावे.

४. सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात खालील लेखाशिर्षाखाली मंजूर झालेल्या तरतुदीच्या मर्यादेत खर्च करण्यात यावा.

मागणी क्र. आर-१

२२१०-वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य,
०१-नागरी आरोग्य सेवा- विषमचिकित्सा,
११०- रुग्णालये व दवाखाने,
०७-आयुष्यमान भारत कार्यक्रम,
(०७) (०२)-प्रधानमंत्री जन आरोग्य योजना (कार्यक्रम) (राज्य हिस्सा ४० टक्के),
२२१० जी ४४९, २०-इतर प्रशासकीय खर्च

५. सदरील खर्च हा सशर्त असून केलेल्या खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र व योजनेच्या प्रगतीचा अहवाल केंद्र व राज्य शासनास विहित प्रपत्रात केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार वेळोवेळी पाठविण्यात यावा. तसेच सदरील निधी हा सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात खर्च करण्यात यावा. प्रधानमंत्री जन आरोग्य योजना या केंद्र पुरस्कृत योजनेसाठी प्राप्त झालेल्या अनुदानापेक्षा अधिक खर्च होणार नाही याची संबंधितांनी दक्षता घ्यावी.

६. सदर शासन निर्णय, नियोजन विभाग अनौपचारिक संदर्भ क्र. ६०/का.१४७२, दिनांक ०६.०२.२०२५ वित्त विभाग,अनौपचारिक संदर्भ क्र. १५१/२०२५/व्यय-१३, दिनांक २०.०२.२०२५ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०३२९१४४३५९६४१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NEELAM GIRISH SANGWAI

Digitally signed by NEELAM GIRISH SANGWAI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=Public Health Department, 2.5.4.20=a9bbc429d62201a67249f70e60acdfadbff901fbbbf45cc393dbd6aa91fbd6ca, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=81e4e52421d72a2ae32df6c7d06abb4e6a7b5820c3a929f328ad6c0dca4f38c7, cn=NEELAM GIRISH SANGWAI
Date: 2025.03.29 15:14:10 +05'30'

**(नीलम संगवई)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. महालेखापाल, लेखा परीक्षा/ लेखा व अनुज्ञेयता, मुंबई.
२. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
३. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
४. आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.

५. मुख्य कार्यकारी अधिकारी, राज्य आरोग्य हमी सोसायटी, मुंबई.
६. संचालक, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई.
७. सहसंचालक, (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा संचालनालय, पुणे.
८. प्रशासकीय अधिकारी, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई. (३प्रती)
९. नियोजन विभाग (कार्यासन१४७२), मंत्रालय, मुंबई.
१०.वित्त विभाग, कार्यासन - व्यय -१३/अर्थसंकल्प-९, मंत्रालय, मुंबई-३२.
११.अर्थसंकल्प शाखा, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२.निवड नस्ती.